**श्री.पुरुषोत्तम मनोहरराव शिंदे, सहायक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित) यांना जलसंपदा विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ (गट-ब) या पूर्वीच्या पदाची सेवा जोडून देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन आदेश क्र.नियुक्ती-११२०/प्र.क्र.१५१/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, चौथा मजला, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- १९ ऑक्टोबर, २०२०.**

<u>वाचा :-</u>

(१) नगर विकस विभाग, शासन निर्णय क्र.टिपीव्ही-१२१४/७१/प्र.क्र.९/नवि-२७, दि.२१.०८.२०१४.
(२) संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण विभाग, मध्यवर्ती कार्यालये, पुणे यांचे पत्र जा.क्र.आस्था/पुमशिंदे/सेवाग्राह्य/प्रशा-१/१६८९, दि.२७.०३.२०१९.
(३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दि.२३.०३.१९९४.
(४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.आप्रयो-१०१२/प्र.क्र.७१/सेवा-३, दि.१९.०१.२०१३.

<u>प्रस्तावना :-</u>

नगर विकास विभागाच्या संदर्भीय क्र.१ येथील दि.२१.०८.२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये श्री.पुरुषोत्तम मनोहरराव शिंदे, सहायक अभियंता श्रेणी-२ यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील सहायक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित) (वेतनश्रेणी रु.९३००-३४८००+ग्रेड पे रु.४४००/-) (सातव्या वेतन आयोगानुसार एस-१५: रु.४१८००-१३२३००) या पदावर दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीकरिता सरळसेवेने नियुक्ती देण्यात आली.

२. संचालक, नगर रचना व मूलनिर्धरण विभाग, पुणे यांचे कार्यालयीन आदेश क्र.आस्था/सनर-श्रे-१/गट-ब/ना.नि./प्रशा-१/४५३७, दि.२२.०८.२०१४ अन्वये श्री.पु.म.शिंदे हे सहायक संचालक, नगर रचना, अलिबाग शाखा कार्यालयातील “सहायक नगर रचनाकार (गट-ब / राजपत्रित)” पदावर दि.०१.०९.२०१४ रोजी रुजू झाले.

३. संचालक, नगर रचना, पुणे यांच्या संदर्भीय क्र.२ येथील दिनांक २७.०३.२०१९ रोजीच्या पत्रान्वये श्री.पु.म.शिंदे, सहायक नगर रचनाकार यांचा पूर्वीच्या पदावरील सेवा नवीन पदावर ग्राह्य धरुन सुधारित वेतननिश्चिती तसेच पूर्वीच्या शासन सेवेतील सर्व लाभ मिळण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने, श्री.पु.म.शिंदे यांची पूर्वीच्या पदावरील सेवा नवीन पदावर ग्राह्य धरण्याबाबत व त्याअनुषंगाने, अनुज्ञेय लाभ मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

<u>शासन आदेश :-</u>

श्री.पुरुषोत्तम मनोहरराव शिंदे, सहायक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित) यांना जलसंपदा विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ (गट-ब) या पदावरील दि.२०.०९.२०१० ते दि.३१.०८.२०१४ या कालावधीची सेवा सहायक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित) या सध्याच्या दि.०१.०९.२०१४ रोजी पासूनच्या सेवेस जोडून देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री.पु.म.शिंदे, सहायक नगर रचनाकार यांची प्रथम नियुक्ती दि.०१.११.२००५ नंतरची असल्याने त्यांना राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजना (पूर्वीची नवीन "परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना") लागू राहील.

३. श्री.पु.म.शिंदे, सहायक नगर रचनाकार यांच्या वेतननिश्चितीबाबत वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दि.२३ मार्च, १९९४ व महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११(२)(ए) मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. श्री.पु.म.शिंदे, सहायक नगर रचनाकार यांची सहायक अभियंता श्रेणी-२ पदावरील रजा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ च्या नियम २१ नुसार नवीन पदावरील रजेच्या हिशोबात जमा करण्यात यावी.

५. सदरचा शासन आदेश, वित्त विभागाच्या दि.२३.०३.१९९४ मधील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक **२०२०१०१९२०२१०८६०२५** असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.10.20 15:27:24 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

श्री.पुरुषोत्तम मनोहरराव शिंदे, सहायक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित)
(द्वारा संचालक, नगर रचना आणि मूल्यनिर्धारण विभाग, पुणे)

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. (३-प्रती)
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७. प्रधान सचिव (नवि-१), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सह संचालक, नगर रचना, कोकण विभाग, कोकण.
९. सहायक संचालक, नगर रचना, रायगड-अलिबाग, शाखा.
१०. निवडनस्ती / नवि-२७.

*****